**संगोपन व संरक्षणाची गरज असलेल्या मुलांसाठी संस्था चालविणाऱ्या स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदान वितरीत करण्याबाबत (२२३५ ३०४१)**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र.बीजीटी- २०१७/प्र.क्र.१०६/का-८,**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : ३० जून, २०१७.

<u>वाचा</u> :१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं २०१५/प्र.क्र. ७५/अर्थ-३ दि. १८ एप्रिल, २०१७.
२. महिला व बाल विकास विभाग , शासन निर्णय संकीर्ण २०११/प्र.क्र.४१८/का-८ दि. १३ सप्टेंबर,२०१३.

**<u>प्रस्तावना</u> :**

सन २०१७-१८ साठी निराश्रित अनाथ,बेघर इ. संगोपन व संरक्षणाची गरज असलेल्या मुलांसाठी संस्था चालविणा-या स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदान देण्यासाठी (२२३५ ३०४१), ३१ सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाखाली रु. ११९५.७० लक्ष निधी अर्थसंकल्पित केला असून सदर निधीपैकी वित्त विभागाच्या संदर्भाधीन परिपत्रकान्वये ८० टक्केच्या प्रमाणात रु.९५६.५६ लक्ष इतका निधी वितरणासाठी उपलब्ध करण्यात आला आहे. सदर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

निराश्रित अनाथ,बेघर इ. संगोपन व संरक्षणाची गरज असलेल्या मुलांसाठी संस्था चालविणा-या स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदान देण्यासाठी (२२३५ ३०४१), ३१ सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाखाली सन २०१७-१८ साठी अर्थसंकल्पित रु. ११९५.७० लक्ष निधी मधून वित्त विभागाच्या संदर्भाधीन परिपत्रकान्वये ८० टक्केच्या प्रमाणात रु.९५६.५६लक्ष इतका निधी वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर प्रयोजनार्थ होणारा खर्च मागणी क्र.एक्स-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२, समाजकल्याण, १०२, बालकल्याण, (०२) स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदान (०२) (०३) संगोपन व संरक्षणाची गरज असलेल्या मुलांसाठी संस्था चालविणाऱ्या स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदान २२३५-३०४१), ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली खर्च करण्यात यावा.

३. रु.९५६.५६लक्ष इतका निधी संगोपन व संरक्षणाची गरज असलेल्या मुलांसाठी संस्था चालविणा-या स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदान देणे या बाबींसाठी खर्च होईल व त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करणे, याची दक्षता आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांनी घ्यावी. तसेच वित्त विभागाच्या वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनांचे आणि संदर्भाधीन परिपत्रकातील सर्व अटी/शर्तींचे पालन करावे.

४. याकरिता आयुक्त,महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. वित्त विभागाच्या संदर्भाधीन परिपत्रकात नमुद तपासणी सूची व विभागास लागू होणा-या बाबींची पूर्तता होत असल्याने विभागाच्या स्तरावरून निधी वितरणास शासन मान्यता देण्यात येत आहे.

६. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध असून त्यांचा संकेतांक क्रमांक २०१७०७०११५५६५६८६३० असा आहे. सदरचा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Smita Dattatray Nivatkar

Digitally signed by Smita Dattatray Nivatkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3fa46cf1e928518ffc98619187a1ef6de2dd57c16934e9cb6672cc02aa258b08, cn=Smita Dattatray Nivatkar
Date: 2017.07.01 15:59:24 +05'30'

**(स्मिता निवतकर)**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. महालेखापाल, १/२ (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा परीक्षा), मुंबई / नागपूर.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई शहर / मुंबई उपनगर.
४. वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
६. सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी.
७. वित्त विभाग (व्यय-६), (अर्थसंकल्प-७), मादाम कामा रोड, मंत्रालय, मुंबई.
८. कक्ष अधिकारी, (का-४), महिला व बाल विकास विभाग, मादाम कामा रोड, मंत्रालय, मुंबई.
९. महिला व बाल विकास विभागातील सर्व अधिकारी व कार्यासने.
१०. निवड नस्ती/का-८